**"प्रादेशिक मनोरुग्णालय, रत्नागिरी व नागपूर येथे अन्नधान्य, किराणा व खादयोपयोगी तसेच नित्योपयोगी किरकोळ वस्तू खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२०/प्र.क्र.३०२/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १२ मार्च, २०२०.

वाचा :

**अति.संचालक, आरोग्य सेवा (मानसिक आरोग्य) मुंबई यांचे पत्र क्रमांक-ससंआसे/अन्नधान्य व नित्योकि.व./प्रशामंजुरी/माआ/टे-२/२३१५-१८/२३४६-४९/१९, दि.३०.११.२०१९. दि.०३.१२.२०१९**

**प्रस्तावना:**

राज्यातील प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर व रत्नागिरी येथील रुग्णांना आहार सेवा देण्यासाठी अन्नधान्य, किराणा व खाद्योपयोगी आणि नित्योपयोगी किरकोळ वस्तुचा पुरवठा करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा उपरोक्त प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:

राज्यातील प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर व रत्नागिरी येथील रुग्णांना आहार सेवा पुरविण्याकरीता अन्नधान्य, किराणा व खादयोपयोगी तसेच नित्योपयोगी किरकोळ वस्तू च्या अंदाजपत्रकास खालील प्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | तपशिल | एकूण बाबी | प्रा.म.रु. नागपूर | प्रा.म.रु. रत्नागिरी |
|---|---|---|---|---|
| १ | अन्नधान्य, किराणा व खादयोपयोगी (अन्नधान्य व किरणा, पालेभाज्या, फळभाज्या, कंदभाज्या,फळे, हिरवा मसाला व चिकन अंडी) | ७७ | रु. १,९१,२८,६४२ | रु. ५७,२८,९५० |

२. सदर प्रशासकीय मान्यता खालील अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती-:**

१. उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये वार्षिक खर्च ३.०० लक्षापेक्षा जास्त असल्याने ई-निविदा पध्दतीने खरेदी करावी.

२. सदरहू अन्नधान्य व किरकोळ वस्तुंची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी त्यांनतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

३. खरेदी आदेश देण्यापूर्वी केंद्रीय खरेदी समितीची मान्यता घेण्यात यावी.

४. उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५. प्रशासकीय मान्यता देतांना प्रस्तावित खरेदीचे दर अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

६. खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/पुरवठानंतर नमुना तपासणी करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

७. खरेदी करण्यात येणाऱ्य बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन आणि वस्तुसूची व्यवस्थापन योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

८. तसेच सदर वस्तुंच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९. संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबवितांना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines)तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०.निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर कार्यरंभ आदेशाची प्रत शासनास सादर करावी. तसेच सदर प्रस्तावावर झालेल्या प्रत्यक्ष खर्चाचा बाबवार तपशील वर्षाखेर शासनास सादर करावा.

३. सदर प्रस्तावातील तुरडाळ, पणन महासंघाकडून प्राधान्याने खरेदी करण्यात यावी. तथापि पणन महासंघाकडून वेळेत पुरवठा न झाल्यास टेंडर च्या दराने तुरडाळ खरेदी करावी.

४. सदर प्रस्तावातील खर्च मागणी क्रमांक आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०५) मनोरुग्णालये, (०५)(०१) मनोरुग्णालये (अनिवार्य), १९ अहार खर्च या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची

टाकण्यात यावा व तो सन २०२०-२० या आर्थिक वर्षात मंजुर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४,नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१२१६५१५८०५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.03.13 12:41:34 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. उपसंचालक आरोग्य सेवा, ठाणे/नागपूर
५. सह संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये राज्यस्तर), मुंबई.
६. अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय नागपूर/रत्नागिरी.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/रत्नागिरी.
८. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).